**आदिवासी विकास विभागाच्या योजनांना प्रसिध्दी देण्याकरीता जाहिरात फलकांच्या खर्चास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक टिआरआय २०१०/ प्रक्र. २०१ / का-५
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२

दिनांक : **२१ ऑगष्ट,२०१०**

**वाचा :** १. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, शासन निर्णय क्र. बियुडी २०१०/प्रक्र.८/ का-६, दिनांक १३.५.२०१०

२.आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे क्र.आस्था/योजनाप्रसिध्दी-२०१०-११ /का-१ / ७१५, दिनांक ६ ऑगस्ट, २०१०

**शासन निर्णय :** आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येणा-या विविध योजनांची माहिती अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना व्हावी म्हणून पत्र्यावरील पोस्टर्स छपाई करुन योजनांना व्यापक प्रसिध्दी देण्याचा प्रस्ताव आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी संदर्भीय दिनांक ६ ऑगस्ट, २०१० च्या पत्रान्वये सादर केला आहे. त्याअनुषंगाने एकूण १,६९,३१७ पत्र्याची पोस्टर्स छपाई करण्यासाठी (आकार २ फूट x ३ फूट) ०.२५ मि.मि. जाड पत्र्यावर चार रंगी सचित्र छपाई व मागील बाजूस सिल्वर कोटीग, डी.टी.पी. आर्टवर्क व प्रोसेसिंगसह येणाऱ्या रु.९,६५,१०,६९०/- (अक्षरी रुपये नऊ कोटी पासष्ठ लक्ष दहा हजार सहाशे नव्वद फक्त ) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात येत आहे. "सदर प्रसिध्दीची कामे शासकीय फोटोझिंको मुद्रणालय, पुणे यांचेकडून अथवा या मुद्रणालयाचे पटलावरील खाजगी संस्थेकडून अशी कामे वाजवी दराने करुन घ्यावीत."

२. या बाबीवर होणार खर्च २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयाचे कल्याण- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ०२ अनुसूचित जमातीचे कल्याण ७९६ जनजाती क्षेत्र योजना (०२) जनजाती क्षेत्र योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०१)(४६) जनजाती उपयोजनेखाली नव्याने अंमलबजावणी करण्यात आलेल्या योजनाची विविध माध्यमामार्फत माहिती व प्रसिध्दी (२२२५ ४११३) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लखाशिर्षाखाली सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून करुन त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर खर्च करण्यास आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४.	संस्थेकडून पोस्टर्स जे अधिकारी प्राप्त करुन घेतील त्या अधिका-यांची स्वाक्षरी घेणे, तसेच आयुक्तालयाकडून ज्यांनी पोस्टर्स वितरीत केली त्यांची स्वाक्षरी व ज्यांना वितरीत केली त्यांची स्वाक्षरी घेऊन त्याचा सर्व हिशेब आयुक्तालयात ठेवण्यात यावा.

५.	सदर पोस्टर्स छपाई व खरेदीमध्ये कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

६.	सदर पोस्टर्स छपाई करुन प्रकल्पनिहाय वितरीत करुन याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक **२०१००८२११४२८३५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशनुसार व नावाने.

**(पि.रा. भोसले)**
**कार्यासन अधिकारी**

प्रति,
राज्यपालाचे खाजगी सचिव, राजभवन, मुंबई
मा.मंत्री / राज्यमंत्री, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय यांचे खाजगी सचिव
आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
महालेखापाल (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ , मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई
मा. प्रधान सचिव (आदिवासी विकास विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
कक्ष अधिकारी कार्यासन ६ , आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (का-५)